**सन २०१७-१८ या आर्थिक वर्षासाठी प्रधानमंत्री आवास योजना (नागरी) अंतर्गत नगर परिषद काटोल यांना BLC (Other than Schedule Castes Component & Schedule Tribe Component) घटकांतर्गतच्या प्रकल्पाकरिता केंद्र हिश्यापोटी उपलब्ध करुन दिलेल्या पहिल्या हप्त्याचा निधी सन २०१८-१९ मध्ये वितरीत करुन खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०१८/प्र.क्र.३३/गृनिधो-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक: १ ऑगस्ट, २०१८.

**प्रस्तावना -**

सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता प्रधानमंत्री आवास योजना (नागरी) अंतर्गत राज्यातील विविध प्रकल्पांकरिता केंद्र शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी संबंधित यंत्रणांना उपलब्ध करुन देण्याकरिता सुकाणू अभिकरण म्हाडास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

केंद्र शासनाने सर्वांसाठी घरे-२०२२ या संकल्पनेवर आधारीत प्रधानमंत्री आवास योजना (नागरी) सुरु केली आहे. सदर योजना राज्यात राबविण्यात येत असून राज्यातील विविध प्रकल्पांकरिता केंद्र शासनाने सन २०१७-१८ करिता निधी उपलब्ध करुन दिलेला होता. सदरचा निधी सन २०१८-१९ मध्ये वितरीत करुन खर्च करण्याकरिता केंद्र शासनाने पुनर्जिवित (Revalidate) करुन दिलेला आहे.

यास्तव, केंद्र शासनाने मान्यता दिल्यानुसार नगर परिषद, काटोल यांना BLC (Other than Schedule Castes & Component Schedule Tribe Component) घटकांतर्गतच्या सोबतच्या विवरणपत्रातील एका प्रकल्पातील एकूण ६०१ घरकुलांच्या प्रकल्पास रुपये ३,१०,८०,०००/-(तीन कोटी दहा लक्ष ऐंशी हजार फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्याकरिता सुकाणू अभिकरण तथा महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई यांना वितरीत करण्यात येत आहे.

तेव्हा, सदर प्रकल्पाच्या सद्य:स्थितीचा आढावा घेऊन केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार सदरचा निधी संबंधित यंत्रणेला टप्पानिहाय वितरीत करण्यात यावा. तसेच याबाबतचा कार्यपालन अहवाल शासनास वेळोवेळी सादर करण्यात यावा.

या प्रयोजनावर होणारा खर्च मागणी क्र.क्यू-३, मुख्य लेखाशीर्ष २२१६, गृहनिर्माण, सर्वसाधारण, १०३ गृहनिर्माण मंडळे इत्यादींना सहाय्य (०८) सर्वांसाठी गृहनिर्माण (०८) ०१ सर्वांसाठी गृहनिर्माण अंमलबजावणी यंत्रणांना अनुदाने (प्र.म.आ.यो.) केंद्र हिस्सा (६०%) (२२१६ २९९६) ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६ च्या परिच्छेद १८ मधील सुचनानुसार राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाला असल्याचे कार्यासन अर्थोपाय यांनी त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.-१०७५/अर्थोपाय, दि.११.४.२०१८ अन्वये कळविले आहे.

सदर निधी वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई यांच्या स्वाक्षरीने आणि अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरित करण्यात यावा. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनाकरिता मंजूर करण्यात आलेला आहे, त्याच प्रयोजनाकरिता खर्च करणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६ मधील परिच्छेद क्र.६ व १८ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार तसेच, वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.४.२०१७ आणि अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दि.३० जून,२०१७ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीची पालन करुन त्याचप्रमाणे वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१७६/व्यय-३, दि.२१.६.२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

प्रस्तुत प्रकरणी वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.२० एप्रिल,२०१६ मधील परिच्छेद क्र.७ ते १८ मधील अटींची व परिशिष्ट क्र.९ मधील तपासणी सूचीतील अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८०११२२२२५४०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

Ranjeet Annasaheb Patil

Digitally signed by Ranjeet Annasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bf330a8fd32cb0303cd333566a693f1c1b6e21697a18d4ebe592b7edd76c8c25, serialNumber=87806c71f378b24b758ee04ca6ca7e3902af4750ed37382a14676de160fa8bf5, cn=Ranjeet Annasaheb Patil
Date: 2018.08.01 12:32:26 +05'30'

**(रणजीत आ.पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन (पत्राने),

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा.मंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई-३२.
४) मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
७) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन,वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
९) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१०) मुख्याधिकारी, नगर परिषद काटोल, जि.नागपूर.
११) कोषागार अधिकारी, नागपूर.
१२) उप सचिव, वित्त विभाग (कार्या-अर्थ-३), मंत्रालय, मुंबई-३२.
१३) सह सचिव, भारत सरकार आवास आणि शहरी गरीबी उपशमन मंत्रालय, निर्माण भवन, ५ वा मजला, नवी दिल्ली-११० ०११. (नोंदणीकृत डाकेने)
१४) सह संचालक, लेखा व कोषागरे कॅम्पुटर सेल, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई-३२.
१५) कक्ष अधिकारी-अर्थ शाखा, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६) निवडनस्ती/गृनिधो-२ कार्यासन , गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

Annexure referred to Sanction No.N-11012/17/2018-HFA-IV UD /EFS-9039187 dated 30.03.2018.
01BLC Project of Maharashtra considered in 25 th CSMC Meeting

| City | Project name | Project Cost (Rs.in Lakhs) | Central share (Rs in Lakhs) | 1st Installment of central Assistance (40%) (Rs in Lakhs) | No.of Benificiaries per DPR | N of Beneficiaries Attached | 1st Installment of CA (40%) acc to number of beneficiaries attached (Rs in Lakhs) | SC Beneficaries | ST Beneficiaries | GEN | To be Released In SC Comonent (Rs in Lakhs) | To be Released In TSP Components (Rs.in Lakhs) | **Release other than SCSP and TSP (Rs.in Lakhs)** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| Katol | Construction of 601 EWS houses under BLC at various location at katol Dist Nagpur | 3089.14 | 901.5 | 360.60 | 601 | 599 | 359.40 | 31 | 50 | 518 | 18.60 | 30.00 | **310.80** |